**नागरी क्षेत्रात जलतरण तलाव निर्माण करताना प्रशिक्षित जीवरक्षक घेण्याबाबतची अट बिल्डींग परमिशनमध्ये समाविष्ट करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**नगर विकास विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांक:- विपआ-२०१५/प्र.क्र.३५६/नवि-२०**

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२

दिनांक:- ०४ नोव्हेंबर, २०१५.

**शासन परिपत्रक:-**

वाढते औद्योगिकीकरण व माहिती तंत्रज्ञान उद्योगात झालेली वाढ यामुळे मोठे गृह प्रकल्प / योजना महानगरपालिका क्षेत्रात पूर्ण झालेल्या आहेत. यामुळे खाजगी जलतरण तलावांची संख्या मोठया प्रमाणात वाढलेली आहे. सदर खाजगी विकासकामार्फत विकसीत होत असलेल्या जलतरण तलावांचे व्यवस्थापन, जीव रक्षक पात्रता व अर्हता यावर स्थानिक नियोजन प्राधिकरणाचे नियंत्रण नसते. पोहणाऱ्यांचा जीव वाचावा यासाठी जीव रक्षकांची नेमणूक केली जात असते. परंतू काही ठिकाणी ज्यांना पोहता येत नाही अशां देखील जीव रक्षकांचे प्रमाणपत्र देण्यात आले आहे. जीव रक्षकाने केवळ पोहणाऱ्यांना वाचवावयाचे नसते तर आपत्कालीन प्रसंगी पोहणाऱ्याला पाण्यातून बाहेर काढल्यानंतर कृत्रिम श्वासोच्छवास देणे, पोटातून पाणी बाहेर काढणे, त्याला प्रथमोपचार देणे गरजेचे असते. माणसाचा जीव वाचविण्यासाठी हे सर्व ज्ञान असणे आवश्यक आहे.

२. सर्वश्री मोहन जोशी व इतर विधानपरिषद सदस्य यांनी सन २०१० च्या पहिल्या (अर्थसंकल्पीय) अधिवेशनात “पुणे शहरातील जलतरण तलावात जीव रक्षक पूर्णपणे प्रशिक्षित नसणे” या विषयावरील चर्चेच्या वेळी शासनातर्फे महानगरपालिका, नगरपालिका क्षेत्रामध्ये जलतरण तलाव निर्माण केले जातील त्यावेळी प्रशिक्षित जीव रक्षक घेतले जावेत असा निश्चित नियम पुढच्या काळात बिल्डींग परमिशनमध्ये समाविष्ट केला जाईल, असे आश्वासन देण्यात आलेले होते.

३. उपरोक्त पार्श्वभूमीवर राज्यातील सर्व महानगरपालिका /नगरपरिषदा / नगरपंचायती यांनी त्यांच्या कार्यक्षेत्रातील बांधकामांना परवानगी देण्याच्या अटींमध्ये जलतरण तलाव निर्माण केले जात असल्यास तेथे प्रशिक्षित जीव रक्षक नेमण्याबाबतचा अंर्तभाव करावा.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेताक २०१५११०४१२४४५८५५२५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Jayasingrao N Patil

Digitally signed by Jayasingrao N Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Jayasingrao N Patil
Date: 2015.11.04 12:45:53 +05'30'

( ज. ना. पाटील )

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा. सभापती, महाराष्ट्र विधान परिषद यांचे सचिव, विधान भवन, मुंबई
३) मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधान सभा यांचे सचिव, विधान भवन, मुंबई
४) मा. राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) प्रधान सचिव-१, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
६) सचिव-२, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
७) आयुक्त, सर्व महानगरपालिका
८) आयुक्त तथा संचालक, नगर परिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
९) मुख्याधिकारी, संबंधित नगरपरिषदा / नगर पंचायत
१०) निवडनस्ती (नवि-२०), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.